**माझी कन्या भाग्यश्री योजनेच्या अटी व शर्तींमध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१६/प्र.क्र.२४३/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक- २४ जानेवारी, २०२२

संदर्भ :- १) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. भाग्यश्री-२०१७/प्र.क्र.१०७/का.३, दिनांक ०१ ऑगस्ट,२०१७.
२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१६/प्र.क्र.२४३/का.६, दिनांक २६ सप्टेंबर,२०१८
३) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक एबाविसेयो/माकभा/शिफ़ारस/२०२०-२१/का-५/८०३, दिनांक २४ फ़ेब्रुवारी, २०२१

**प्रस्तावना :-**

मुलींचा जन्मदर वाढविणे, लिंग निवडीस प्रतिबंध करणे, मुलींच्या शिक्षणाबाबत प्रोत्साहन तथा खात्री देणे, मुलींच्या आरोग्याचा दर्जा वाढविणे यासाठी दिनांक १ एप्रिल २०१६ पासून लागू करण्यात आलेली "माझी कन्या भाग्यश्री" ही योजना अधिक्रमित करुन माझी कन्या भाग्यश्री सुधारित नविन योजना दिनांक १ ऑगस्ट २०१७ पासून ज्या कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रुपये ७.५० लाख (रुपये सात लाख पन्नास हजार फक्त) पर्यंत आहे अशा समाजातील सर्व घटकांसाठी संदर्भाधीन दिनांक १ ऑगस्ट, २०१७ च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेली आहे.

२. जिल्हास्तरावर योजना राबविताना येणा-या अडचणी विचारात घेऊन सदर योजनेच्या काही शर्ती/अटीमध्ये संदर्भाधीन दिनांक २६ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आल्या आहेत. सदर माझी कन्या भाग्यश्री सुधारित योजनेच्या व्याप्तीत वाढ करण्याच्या दृष्टीने त्यामधील अटी व शर्तीमध्ये आणखी सुधारणा करण्याचा प्रस्ताव आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी संदर्भाधीन क्र. ३ येथील पत्रान्वये सादर केला होता. त्यामुळे संदर्भाधीन दिनांक २६ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या सुधारणा व नव्याने करावयाच्या सुधारणा याबाबत सुसुत्रीकरणाकरिता संदर्भाधीन दिनांक २६ सप्टेंबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णय अधिक्रमित करून सदर योजनेच्या व्याप्तीत वाढ करण्याच्या दृष्टीने त्यामधील अटी व शर्तीमध्ये एकत्रीत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

माझी कन्या भाग्यश्री सुधारित नविन योजना दिनांक १ ऑगस्ट २०१७ पासून ज्या कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रुपये ७.५० लाख (रु. सात लाख पन्नास हजार फक्त) पर्यंत आहे अशा समाजातील सर्व घटकांसाठी दिनांक १ ऑगस्ट २०१७ च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेली आहे. त्यानुसार सदर शासन निर्णयामध्ये यापूर्वी

करण्यात आलेल्या सुधारणांबाबतचा संदर्भाधीन दिनांक २६ सप्टेंबर, २०१८ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करून सदर योजनेची व्याप्ती वाढविण्याच्या दृष्टीने त्यामधील शर्ती/अटीमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| **अ.क्र.** | **शासन निर्णय दि.०१.०८.२०१७ व शासन निर्णय दि.२६.०९.२०१८ मधील तरतूद** | **आता या शासन निर्णयान्वये त्यामध्ये करण्यात येत असलेली सुधारणा** |
|---|---|---|
| १. | "माझी कन्या भाग्यश्री सुधारित योजना" ज्या कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रु.७.५० लाख पर्यंत आहे अशा समाजातील सर्व घटकांसाठी लागू करण्यात आलेली आहे. | "माझी कन्या भाग्यश्री सुधारित योजना ज्या कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न **रु.८ लाख** पर्यंत आहे अशा समाजातील सर्व घटकांसाठी लागू करण्यात येत आहे. |
| २. | लाभार्थी मुलीचे वडील महाराष्ट्र राज्याचे मूळ रहिवाशी असणे आवश्यक आहे. | लाभार्थी मुलीचे **आई किंवा वडील** महाराष्ट्र राज्याचे मूळ रहिवाशी असणे आवश्यक आहे. |
| ३. | | प्रथम जुळ्या मुलीनंतर कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया केल्यानंतर सदर दोन्ही मुलींना प्रत्येकी रु.२५,०००/- लाभ देण्यात यावा. |
| ४. | बाल गृहातील अनाथ मुलीसाठी सदरची योजना लागू राहील | बाल गृहातील अनाथ मुलीसाठी सदरची योजना लागू राहील तसेच अनाथ परंतु नातेवाईकाबरोबर राहणा-या एक / दोन मुलीसाठी योजनेचा लाभ अनुज्ञेय राहील, |
| ५. | | जुळ्या अपत्यांपैकी ट्रान्सजेंडर अपत्याबरोबर जन्मणा-या एका मूलीस एक दुर्मिळ बाब म्हणून सदर योजनेचा लाभ अनुज्ञेय राहील. तसेच प्रथम अथवा द्वितीय अपत्यांपैकी एक ट्रान्सजेंडर अपत्य व दुसरे अपत्य मुलगी असल्यास सदर मुलीस या योजनेमधून रु.२५०००/- इतका लाभ अनुज्ञेय राहील. |
| ६. | एका मुलीच्या जन्मानंतर माता/पित्याने २ वर्षाच्या आत कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया करुन योजनेचा लाभ मिळण्यासाठी संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी ग्रामीण/नागरी यांच्याकडे अर्ज सादर करणे आवश्यक आहे. त्यांनतर सादर केलेल्या अर्जाचा विचार करता येणार नाही. तसेच दोन मुलींनंतर १ वर्षाच्या आत कुटुंबनियोजन शस्त्रक्रिया केल्याचे प्रमाणपत्र अर्जासोबत सादर करणा-या कुटुंबांनाच या योजनेचा लाभ अनुज्ञेय असेल. | एका मुलीच्या जन्मानंतर माता/पित्याने २ वर्षाच्या आत कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया करून योजनेचा लाभ मिळण्यासाठी संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी ग्रामीण/नागरी यांच्याकडे अर्ज सादर करणे आवश्यक आहे. त्यांनतर सादर केलेल्या अर्जाचा विचार करता येणार नाही. तसेच दोन मुलींनंतर १ वर्षाच्या आत कुटुंबनियोजन शस्त्रक्रिया केल्याचे प्रमाणपत्र अर्जासोबत सादर करणा-या कुटुंबांनाच या योजनेचा लाभ अनुज्ञेय असेल. तसेच मुलीचे लसीकरण झाल्याबाबतची खातरजमा करण्यात यावी. |

२. मातेने/पित्याने कुटुंब नियोजनाची शस्त्रक्रिया केल्याचा दाखला योजनेचा लाभ घेण्यापूर्वी सादर करणे आवश्यक राहील. मात्र विधवा महिलेने पती निधनाचे प्रमाणपत्र अर्जासोबत सादर केल्यास तिच्याकडून कुटुंब नियोजन प्रमाणपत्राची मागणी करण्यात येऊ नये व योजनेचा लाभ मंजूर करण्यात यावा.

३. योजनेचा अंतिम लाभ घेताना मुलीचे वय १८ वर्ष पूर्ण होणे तसेच तिने १८ वर्ष पूर्ण होईपर्यंत अविवाहित असणे आवश्यक राहील. इयत्ता १० वी उत्तीर्ण अथवा अनुत्तीर्ण असली तरी तिला योजनेचा लाभ अनुज्ञेय राहील. वयाच्या टप्यानुसार वेळोवेळी देय होणारे व्याज तीला अनुज्ञेय राहील.

४. सावित्रीबाई फुले कन्या पारितोषिक योजना दिनांक १ ऑगस्ट २०१७ पासून सार्वजनिक आरोग्य विभागाने दिनांक १९ सप्टेंबर २०१७ च्या शासन निर्णयान्वये बंद केली असल्यामुळे लाभार्थ्यांकडून या योजनेचा लाभ घेतला नसल्याचे प्रमाणपत्राची मागणी करण्यात येऊ नये.

५. आयुक्तालयाकडुन योजनेचा निधी जिल्हा परिषदेच्या लेखा विभागास उपलब्ध करून न देता तो जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास),जिल्हा परिषद यांच्या खात्यास उपलब्ध करून देण्यात यावा जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास),जिल्हा परिषद यांना बँक ऑफ महाराष्ट्र मध्ये चालु खाते उघडण्यास आयुक्त ए.बा.वि. सेवायोजना, नवी मुंबई यांनी अनुमती दिलेली आहे. सदर खात्यात जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास),जिल्हा परिषद यांनी निधी जमा करावा.

६. बँक ऑफ महाराष्ट्रच्या (जिल्हा शाखेस) योजना राबविण्यासाठी तालुका किंवा गाव पातळीवरील शाखेमध्ये खाते उघडून लाभार्थ्यांना योजनेचा लाभ द्यावयाचा असल्यास त्याप्रमाणे त्यांना कार्यवाही करण्याची अनुमती देता येईल. परंतू योजनेचे समन्वय अधिकारी जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास),जिल्हा परिषद हेच राहतील.

७. सदर योजनेबाबतच्या उर्वरित शर्ती/अटी संदर्भाधीन दिनांक १ ऑगस्ट २०१७ च्या शासन निर्णयात नमुद केल्यानुसार कायम रहातील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०१२४१७२९३८८०३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, pseudonym=58C42BF9F3ABBB1C15CFBC42D0AA8503E42564DB, serialNumber=7EBBBC3712E8D459EF90BF7AAE4EA46E9CAEBDD50CFECDE2EE7CE0454FA0416A, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2022.02.08 16:38:01 +05'30'

**( महेश वरूडकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई
२) मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
३) मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
४) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
६) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
८) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(महिला व बाल विकास),जिल्हा परिषद.
९) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प.
१०) निवड नस्ती -का-६.